कुटुंबनिवृत्तीवेतन मंजूर करण्याबाबत.
**दिवंगत श्री. आर.के.कृष्णन, सहा. पोलीस उप निरिक्षक यांच्या कुटुंबियांस..**
**समादेशक, रा. रा. पो.ब. गट क्र ७, दौंड**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कुनिवे ०८१४/प्र.क्र. १३४/आस्था-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, नवीन प्रशासकीय भवन, १२ वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ६ जुलै, २०१५.

**वाचा :**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक पोमंस/३९/४२/कुनिवे-कृष्णन/३०/२०१३, दि. ११.७.२०१३.

**प्रस्तावना :**

दिवंगत श्री.आर.के. कृष्णन, सहाय्यक पोलीस उपनिरिक्षक, हे, समादेशक,राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.७, दौंड यांच्या आस्थापनेवर कार्यरत असतांना दि.२८.२.१९८१ रोजी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाले होते. तदनंतर, दि.२४.१२.२००६ रोजी त्यांचे निधन झाले आहे.

दिवंगत श्री.कृष्णन हे सेवानिवृत्त झाले तेव्हा अविवाहित असल्याने कुटुंब निवृत्ती वेतनासाठी त्यांनी त्यांच्या भावाची पत्नी श्रीमती सुमती यांचे नामनिर्देशन केले होते. सेवानिवृत्तीनंतर, दिवंगत श्री.कृष्णन यांनी दि.२०.८.१९८८ रोजी श्रीमती के.राधा यांच्याशी विवाह केला. या अनुषंगाने त्यांच्या पत्नी श्रीमती के.राधा यांचे नामनिर्देशन करण्याबाबत दि.४.११.२००६ रोजी अर्ज सादर केला. श्रीमती सुमती या दिवंगत श्री.कृष्णन यांचा लहान भाऊ श्री.भास्करन यांच्या पत्नी आहेत. श्रीमती के.राधा यांनी त्यांचे नामनिर्देशन करण्याच्या विनंतीसोबत स्वत:चे शपथपत्र व श्रीमती सुमती यांचे ना-हरकत शपथपत्र व लग्नाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. श्रीमती सुमती यांचे पती श्री.भास्करन हे शिक्षक होते, त्यांच्या पश्चात, श्रीमती सुमती त्यांच्या पतीचे कुटुंब निवृत्ती वेतन घेत आहेत.

सदर कागदपत्रांच्या आधारे कुटुंब निवृत्ती वेतन मंजूर करणेबाबत प्रकरण महालेखापाल कार्यालयास सादर केले असता, या प्रस्तावास शासनाची मान्यता घेण्याबाबत महालेखापाल-१, मुंबई यांनी त्यांचे पत्र क्रमांक PR ९/CH४/११/ORD/६०३६३३२९, दिनांक १८.१०.२०११ अन्वये सुचित केले आहे. दिवंगत श्री.कृष्णन यांच्या पत्नी श्रीमती के.राधा यांनी त्यांच्या विवाहाच्या कायदेशीर वैधतेबाबत मा.कुटुंब न्यायालय,तिरुअनंतपूरम यांच्याकडून प्रकरण क्रमांक ३१/२०१० अन्वये दिनांक ३१.७.२०१० रोजी आदेश प्राप्त करुन घेतले आहेत. सदरहु आदेशानुसार श्रीमती के.राधा या दिवंगत श्री.कृष्णन यांच्या कायदेशीर पत्नी असल्याचे तसेच या विवाहातून जन्मलेली मुलगी श्रीमती सलिनी या दोघींही कायदेशीर वारस असल्याचे स्पष्ट केले आहे.

प्रकरणाची वरील वस्तुस्थिती, मा.कुटुंब न्यायालयाचे वरील आदेश व यासंदर्भातील वित्त विभागाचे दि. ३.७.२०१० च्या परिपत्रकातील तरतूदी या सर्व बाबी विचारात घेता दिवंगत श्री.कृष्णन,सेवानिवृत्त सहाय्यक पोलीस उपनिरिक्षक यांच्या पश्चात देय असलेले कुटुंबनिवृत्ती वेतन त्यांच्या पत्नी श्रीमती के.राधा यांना देण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

दिवंगत सहाय्यक पोलीस उपनिरिक्षक श्री.आर.के. कृष्णन यांच्या पश्चात त्यांच्या पत्नी श्रीमती के. राधा यांना कुटुंबनिवृत्तीवेतन प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५७/२०१५/सेवा-९, दिनांक २०.६.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०६१२५६५५५०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: CN = Yuvraj Bayaji Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.07.06 13:08:40 +05'30'

**युवराज अजेटराव**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्रमांक ७, दौंड, जि. पुणे.
३) महालेखापाल ( लेखा व हकदारी), महाराष्ट्र -१, मुंबई.
४) दिवंगत श्री. आर. के. कृष्णन, सहा. पोलीस निरिक्षक यांच्या पत्नीस समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्रमांक ७, दौंड यांच्या कार्यालयामार्फत.
५) कार्यासन आस्था-१ (संग्रहार्थ).